इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर या संस्थेस वर्ग ४ संवर्गाच्या सेवा बाह्यस्त्रोतामार्फत राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**
शासन निर्णय क्रमांकः वैशिवि-२०२२/प्र.क्र. ७४/प्रशा-२
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
गो. ते. संकुल इमारत, ९ वा मजला, मंत्रालय, मुंबई.
तारीखः १८ मे, २०२३

वाचा :-

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र. ८२/भाग-III/उद्योग-४, दि. ०१.१२.२०१६
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि- २०२२/प्र.क्र.१५/आ.पु.क., दिनांक २७.०४.२०२२.
४) शासन निर्णय समक्रमांक दिनांक १८.०४.२०२२.
५) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन यांचे पत्र क्रमांकः डीएमईआर-१२०३६/२/२०२२-ईडीयु, दिनांक ०४.०५.२०२३.

**शासन निर्णय :-**

वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाच्या अधिपत्याखालील इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर या संस्थेमधील वर्ग ४ च्या नियमित मंजूर असलेल्या पदांपैकी रिक्त असलेली १६५ पदे बाह्यस्त्रोतामार्फत उपलब्ध करुन घेण्यास व त्याकरीता ११ महिन्यासाठी येणा-या रु. ३,४९,६९,४६०/- एवढ्या खर्चास संदर्भ क्र. ४ वरील दिनांक १८.०४.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. त्यानुषंगाने संस्थास्तरावर सेवा पुरवठादारासोबत करण्यात आलेल्या कराराची मुदत दिनांक ०४.०५.२०२३ रोजी समाप्त झाली आहे. इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर या संस्थेमधील वर्ग ४ च्या नियमित मंजूर पदांपैकी रिक्त असलेली पदे स्पर्धापरिक्षेच्या माध्यमातून टी.सी.एस. कंपनीमार्फत भरण्याची कार्यवाही सुरु आहे. तथापि, सदर पदे नियमित उपलब्ध होण्यास काही अवधी लागणार आहे. यास्तव इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर या संस्थेमधील वर्ग ४ ची १६५ पदे बाह्यस्त्रोतामार्फत संदर्भ क्र. ४ वरील शासन निर्णयात नमुद दराने उपलब्ध करुन घेण्यासाठी यापुर्वी संस्थास्तरावर करण्यात आलेल्या करारास पुढील ६ महिने अथवा टी.सी.एस. मार्फत स्पर्धापरिक्षेच्या माध्यमातून नियमित पदे उपलब्ध होई पर्यंत यापैकी जे आधी घडेल तो पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सदर सेवा/पदे बाह्ययंत्रणेद्वारे उपलब्ध करून घेतांना उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय दि. ०१.१२.२०१६ मधील तरतुदींनुसार विहित प्रक्रियेचे पालन करण्याच्या अटीच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे. तसेच शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या सर्व अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे. तसेच सेवा पुरवठादार संस्थेने सुध्दा शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या अटी शर्तीचे (उदा. किमान वेतन, कर्मचारी भविष्य निर्वाह निधी इत्यादीबाबत.) पालन करणे बंधनकारक राहील.

३. सदर बाबीसाठी येणारा खर्च संस्थेच्या खालील लेखाशीर्षाखालील (१०) कंत्राटी सेवा या उद्दिष्टांतर्गत सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात मंजूर निधीतून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक - एस-१
२२१०, वैद्यकीय सेवा व आरोग्य विभाग
०१ नागरी आरोग्य सेवा- विषम चिकित्सा
११०- मुफसले रुग्णालये व दवाखाने
(०२) मुफसले रुग्णालये व दवाखाने
मुफसले क्षेत्रातील शासकीय अध्यापन रुग्णालये
(०२)(०७) मेयो सर्वोपचार रुग्णालय, नागपूर
सांकेतांक- २२१० १६९९
१०- कंत्राटी सेवा

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक १७.०४.२०१५ मधील उप विभाग चार, अ.क्र. ११ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५१८१५१८२६३९१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO JOGDAND

Digitally signed by MAHADEO JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459, pseudonym=85719993A847361CF1CE96786397786A408A4972, serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3, cn=MAHADEO JOGDAND
Date: 2023.05.18 03:18:16 -07'00'

म.गि.जोगदंड
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल १/२ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
२. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.

३. संचालक,वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.

४. अधिष्ठाता, इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालय, नागपूर.

५. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.

८. निवडनस्ती (प्रशा-२), वैद्यकीय शिक्षण विभाग,मंत्रालय, मुंबई.